**महाराष्ट्र शासन**

**जनगणना प्राथम्य/ईमेलद्वारे**

**क्र.:** जनगणना २०१०/प्र.क्र.१८६/५
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ मे, २०१०.

**प्रति,**

मंत्रालयातील सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगरपालिका आयुक्त.

**विषय :** जनगणना-२०११ साठी शासकीय/निम शासकीय कर्मचारीवर्ग उपलब्ध करण्याबाबत.

**संदर्भ :** मा. मुख्य सचिव यांचे समक्रमांकाचे, दि.१६ एप्रिल, २०१० चे अर्धशासकीय पत्र.

**महोदय/महोदया,**

महाराष्ट्र राज्यात जनगणना-२०११ चा पहिला टप्पा - "घरयादी बनविणे - दिनांक १ मे, २०१० ते १५ जून, २०१०", या कालावधीतील काम दिनांक १ मे, २०१० पासून सुरु झालेले आहे.

२. जनगणनेच्या कामासाठी आवश्यक कर्मचारी वर्ग उपलब्ध करुन देण्याच्या व जनगणनेच्या कामासाठी नियुक्त केलेल्या कर्मचा-यांनी त्यांचे स्वत:चे मूळ काम सांभाळून रोज दोन तास जनगणनेचे काम करावयाच्या सूचना संदर्भाधीन मा. मुख्य सचिवांच्या अर्धशासकीय पत्रान्वये सर्व संबंधितांना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, उन्हाळयाच्या दिवसांत जनगणनेचे काम करताना संबंधीत कर्मचा-यांना येत असलेल्या अडचणीं (कर्मचा-यांचे निवासस्थान, कार्यालय व जनगणनेचे काम करण्यासाठी नियुक्त केलेले केंद्र/ठिकाण हे दूरवर असल्यामुळे) विचारात घेता जनगणनेचे नियोजित काम रोज दोन तास याप्रमाणे केल्यास विहीत मुदतीत ते पूर्ण होण्यास अडचणीं येणार असल्याची बाब निदर्शनास आली आहे, व संचालक, जनगणना, महाराष्ट्र, भारत सरकार, मुंबई यांनीही या बाबीस दुजोरा दिला आहे. हया सर्व बाबी विचारात घेऊन **जनगणनेच्या कामासाठी नियुक्त केलेल्या कर्मचा-यांनी (प्रगणक/पर्यवेक्षक) जनगणनेचे काम एका आठवडयातून पूर्ण ३ दिवस पूर्णवेळ करुन उर्वरित दिवशी त्यांच्या मूळ कार्यालयातील काम पूर्णवेळ करावे अशा**

**सुधारित सूचना देण्यात येत आहेत.** त्यामुळे कर्मचा-यांना जनगणनेचे काम सौकर्याने करता येईल व या कामासाठी नेमलेल्या कर्मचा-यांच्या कार्यालयांचीही गैरसोय होणार नाही. कर्मचा-यांनी कोणते ३ दिवस जनगणनेचे काम करावे हे संबंधीत कार्यालयांच्या आस्थापनांनी संबंधित जनगणना कार्यालयांशी संपर्क साधून परस्पर निश्चित करावे. मात्र, कोणत्याही परिस्थितीत जनगणनेशी निगडीत सर्व कामे विहीत कालावधीत नियोजित वेळेत परिपूर्णरित्या केल्या जातील व त्यात कमतरता राहणार नाही याची खबरदारी सर्व संबंधितांनी घ्यावी.

३. प्रस्तुत शासन पत्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक 201005171313120001 असा आहे.

आपला,

(सि. मं. इनामदार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी :

(१) सर्व मंत्रालयीन विभागाचे उप सचिव/ सह सचिव (आस्थापना),
(२) सर्व जिल्हाधिकारी,
(३) संचालक, जनगणना कार्यालय, भारत सरकार, बेलॉर्ड इस्टेट, मुंबई.
(४) निवड नस्ती.

D:\P\nagpur\Census letter\345